सन २०१९-२० करीता जिल्हा वार्षिक
आदिवासी घटक कार्यक्रम तयार करणेबाबत
मार्गदर्शक तत्वे व कालबध्द कार्यक्रम

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः टिएसपी-२०१८/प्र.क्र.१५०/का.६

मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२
तारीख: **३१ ऑक्टोबर,२०१८.**

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः टिएसपी २००८/प्र.क्र.६/का-६, दि.१६ डिसेंबर, २००९.
२) शासन परिपत्रक क्रमांकः नियोजन विभाग, क्र.डिएपी १०१८/प्र.क्र.१३०/का-१४८१, दि.२९.०९.२०१८.
३) शासन निर्णय क्रमांकः टिएसपी-२०१७/प्र.क्र.२१९/का.६,दि.२५.१०.२०१८.

**परिपत्रक-**

आदिवासी विकास विभागाच्या दिनांक १६ डिसेंबर, २००९ च्या संदर्भाधिन शासन निर्णयानुसार जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना मंजूर करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा नियोजन समितीकडे सोपविण्यात आली आहे. त्यानुसार जिल्हा आराखडा तयार करण्याची जबाबदारी जिल्हा नियोजन समितीचे सदस्य सचिव म्हणून जिल्हाधिकारी यांच्या नियंत्रणाखाली संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांची राहील. तसेच वित्त विभागाच्या दिनांक २७.०१.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये आर्थिक वर्ष सन २०१७-१८ पासून योजनांतर्गत व योजनेतर खर्चाचे एकत्रिकरण करणेबाबतचा निर्णय घेण्यात आला असून या अन्वये अर्थसंकल्पिय खर्चाचे यापुढे “अनिवार्य खर्च”, “कार्यक्रमांवरील खर्च” आणि “महसूली”व “इतर (भांडवली व ऋण) खर्च” याप्रमाणे वर्गीकरण दर्शविण्यात आले आहे. तसेच या शासन निर्णयानुसार सन २०१७-१८ पासून आदिवासी उपयोजनेस (Tribal Sub-plan) आदिवासी घटक कार्यक्रम (Tribal Component Schemes) असे संबोधण्यात येत आहे. त्यानुसार आर्थिक वर्ष सन २०१९-२० करीता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना (जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम) तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**२.** आदिवासी घटक कार्यक्रम हा राज्याच्या वार्षिक योजनेचा एक भाग असून वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम तयार करणे हे वार्षिक योजनेच्या कार्यक्रमाशी पूरक आहे. सन २०१९-२० च्या जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रमाचे प्रारुप आराखडे संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी जिल्हाधिकारी

यांच्याशी चर्चा करुन तयार करावेत व ते जिल्हा आदिवासी उपयोजना समिती/जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावेत.

३. वार्षिक आदिवासी उपयोजना आराखडा तयार करीत असताना खालील मार्गदर्शक सुचना व तत्वांचे काटेकोरपणे पालन करावे :-

१) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय दि.२५.१०.२०१८ अन्वये मागासवर्गीय कल्याण या विशेष क्षेत्रांतर्गत असलेल्या आस्थापना/ बांधिल स्वरुपाच्या जिल्हास्तरीय योजना राज्यस्तर योजनांमध्ये वर्ग करण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुषंगाने आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत नियोजन/वित्त विभागाकडून प्राप्त होणा-या एकूण वार्षिक नियतव्ययापैकी आदिवासी विकास विभागाच्या आस्थापनाविषयक (वेतन व कार्यालयीन बाबी ) तसेच बांधील स्वरुपाच्या (साधन सामुग्री, आहार, शैक्षणिक दायित्व ) खर्चाच्या योजनांकरीता आवश्यक नियतव्यय वजा करून उर्वरीत ईतर विकासात्मक योजनाकरिता शिल्लक राहणाऱ्या नियतव्ययामधून राज्यस्तर व जिल्हास्तर उपयोजनांकरिता नियतव्यय वाटप करण्याबाबत सुधारीत सुत्र निश्चित करण्यात आले आहे. सदर सुधारीत सुत्रानुसार इतर विकासात्मक नियतव्ययाचे वाटप पेसा ग्रामपंचायतींना थेट अनुदान करीता ५ टक्के, राज्यस्तरीय योजनांकरीता ५५ टक्के व जिल्हास्तरीय योजनांकरीता ४० टक्के असे करण्यात आले आहे.

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाचे राज्य वार्षिक योजनेचे आकारमान अद्याप निश्चित झालेले नसल्यामुळे आदिवासी घटक कार्यक्रमाकरीता चालु वर्षासाठी (२०१८-१९) प्राप्त नियतव्यय आधारभूत मानुन **"परिशिष्ट-अ"** प्रमाणे जिल्हास्तर योजनांकरीता उपरोक्त सुधारित सुत्रानुसार नियतव्यय वाटप करण्यात येत आहे. जिल्हा वार्षिक आदिवासी योजना सन २०१९-२० चे आराखडे अंतिम करण्यासाठी जेव्हा मा. मंत्री (आदिवासी विकास) यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरावरील बैठकीत चर्चा होईल, त्यावेळी सन २०१९-२० करीता राज्य वार्षिक योजना व सर्व जिल्हा वार्षिक योजनेसाठी उपलब्ध असलेल्या एकुण साधनसंपत्तीचे आकारमान स्पष्ट झालेले असेल व ते लक्षात घेवून प्रस्तावित जिल्हा वार्षिक आदिवासी योजना सन २०१९-२० ला अंतिम स्वरुप देण्यात येईल.

२) आदिवासी उपयोजना क्षेत्र (TSP)/ अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्र (ATSP) , माडा/ मिनीमाडा क्षेत्र व आदिवासी उपयोजनेबाहेरील क्षेत्र (OTSP) व त्यामधील अनुसुचित जमातींची लोकसंख्या विचारात घेऊन सोबत जोडलेल्या **"परिशिष्ट-ब" व "परिशिष्ट-क"** प्रमाणे जिल्हानिहाय व प्रकल्पनिहाय कमाल नियतव्यय मर्यादा निश्चित करण्यात येत आहे.जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम आराखडा **परिशिष्ट-ब** मध्ये दिलेल्या कमाल नियतव्ययाच्या मर्यादेत असावा तसेच ज्या जिल्हयामध्ये एकापेक्षा अधिक प्रकल्प कार्यालये आहेत त्यांचेसाठी प्रकल्पनिहाय नियतव्यय वाटप **परिशिष्ट-क** प्रमाणे असावे.

३) जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम तयार करतांना **<u>परिशिष्ट-ड</u>** मधील मार्गदर्शक तत्वे तसेच नियोजन विभागाच्या दिनांक २९सप्टेबर, २०१८ रोजीच्या शासन परिपत्रकामधील सर्वसाधारण सूचना विचारात घेण्यात याव्यात.

४) आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षापासून संदर्भाधीन वाचा येथील दि.*२५.१०.२०१८* रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टामधील जिल्हास्तरावरील योजना राज्यस्तरावर वर्ग करण्यात आल्या असल्याने सदर योजनांकरीता यापुढे राज्यस्तरावरून तरतूद उपलब्ध करून देण्यात येईल, **<u>त्याकरिता जिल्हास्तरावरून कोणतीही तरतूद प्रस्तावित करण्यात येऊ नये.</u>**

५) शिक्षण, आरोग्य, कृषी,जलसंधारण, ऊर्जा, कौशल्य विकास, रस्तेविकास इत्यादि विकास क्षेत्रनिहाय निधीवाटप निश्चित करताना या क्षेत्रातील यापूर्वीचे अपेक्षीत साध्य, फलनिष्पत्ती, प्रस्तावित बदल इत्यादि अनुषंगीक बाबी विचारात घेऊन त्याच्या पुर्ततेसाठी आदिवासी घटक कार्यक्रम व सर्वसाधारण क्षेत्र योजना याखाली जिल्ह्यास विविध योजनांतर्गत प्राप्त होऊ शकणाऱ्या निधीचे नियोजन एकत्रितपणे विचारात घेऊन करण्यात यावे. तसेच नाविन्यपूर्ण किंवा अन्य अबांधील स्वरूपातील निधीच्या माध्यमातून अस्तित्वात असलेल्या योजनांमधून करता न येणाऱ्या कामांसाठी निधी “गॅप फंड” म्हणून वापरण्यात यावा. शक्यतो एकाच प्रकारच्या कामासाठी कोणत्याही परिस्थितीत दोन वेगवेगळया योजनांच्या माध्यमातून वेगवेगळयाने निधी उपलब्ध होणार नाही याची दक्षता जिल्हा नियोजन समितीने घ्यावी. मात्र काही कामांसाठी केंद्र पुरस्कृत योजनांद्वारे निधी मिळत असल्यास त्यामधुन अशी कामे प्रस्तावित करून उर्वरित कामांसाठी राज्यशासनाकडून विविध स्त्रोताद्वारे जिल्हयास उपलब्ध होणाऱ्या निधीचे एककेंद्राभिमुखता (Convergence) पध्दतीने नियोजन करुन फलनिष्पत्ती दायक अंमलबजावणी आराखडा तयार करावा.

६) नियोजन विभागाने “MP-SIMS” ही सर्वंकष योजना माहिती प्रणाली विकसित केली असुन सदर प्रणालीचा जिल्हा वार्षिक आदिवासी योजना सन २०१९-२० तयार करताना सर्व जिल्हास्तरीय कार्यालय/यंत्रणांनी वापर करणे बंधनकारक आहे. लहान गट, जिल्हा नियोजन समिती व राज्यस्तरीय बैठकीसाठी तयार करण्यात येणारा जिल्हा योजनेचा आराखडा कार्यान्वयीन यंत्रणांनी योजना माहिती प्रणालीमध्येच (MP- SIMS) सादर करण्यात यावा.

७) आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कामे / योजना राबविण्याकरीता अशा योजनांचे कार्यक्षेत्र आदिवासी क्षेत्रामध्ये आहे किंवा कसे याबाबत जिल्हाधिकारी यांनी स्वत: खात्री करावी. आदिवासी क्षेत्राकरिता केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेरील योजनेमध्ये खर्च करता येणार नाही याची काळजी संबंधित जिल्हाधिकारी तसेच योजना अंमलबजावणी अधिकारी यांनी घ्यावी.

८) योजना अंमलबजावणी विषयक संबंधित विभाग प्रमुखांनी प्रस्तावित कामे आदिवासी क्षेत्रातील आहेत याबाबतचे प्रमाणपत्र प्रशासकीय मान्यतेच्यावेळी अंदाजपत्रकासोबत जोडावे व जिल्हाधिकारी यांनी प्रशासकीय मान्यता देताना असे प्रमाणपत्र असल्याशिवाय प्रशासकीय मान्यता देऊ नये.

९) विविध योजनांच्या संदर्भात प्रकल्प अधिकाऱ्यांनी त्यांच्या प्रकल्प क्षेत्रात दौरे करुन क्षेत्रीय पातळीवरील अंमलबजावणी अधिकाऱ्यांशी चर्चा करावी व त्यानुसार त्यांच्या क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांच्या दृष्टीने नेमकी गरज लक्षात घ्यावी व नेमक्या कोणत्या योजना घेण्याची आवश्यकता आहे हे निश्चित करावे. असे करताना ज्या भागात सदर योजना राबवावयाची असेल त्या भागातील मोठ्या संख्येने अनुसुचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल अशा कामांना सर्व प्रथम प्राधान्य द्यावे व त्यांची गरज भागविल्यानंतर त्यापेक्षा कमी लोकसंख्येला लाभदायी ठरणाऱ्या योजनांना अग्रक्रम द्यावा. सन २०१९-२० चा जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम हा शासनाने दिलेल्या नव्या मार्गदर्शक तत्वांनुसार तयार करावयाचा आहे. अंदाज समितीने त्यांच्या चौदाव्या अहवालातील शिफारशीला अनुलक्षून विधान सभा सदस्यांना त्यांच्या मतदारसंघातील कोणत्या कामासाठी किती तरतूद करण्यात आली याची माहिती मिळावी या हेतूने प्रत्येक योजनेसाठी प्रस्तावित केलेल्या एकूण नियतव्ययाची **विगतवारी प्रकल्प क्षेत्रातंर्गत विकास गटनिहाय/तालुकानिहाय स्वतंत्रपणे दाखविण्यात यावी.**

१०) जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रमात प्रस्तावित केलेल्या नियतव्ययाची विकासक्षेत्र/ उपक्षेत्र / योजना/ प्रकल्प निहाय, तालुकावार विगतवारी जिल्हा आदिवासी घटक कार्यक्रम / जिल्हा नियोजन समितीच्या सदस्यांना बैठकीपूर्वी उपलब्ध करुन देण्यात यावी.

११) सन २०१९-२० जिल्हा वार्षिक योजनेस राज्यस्तरावर अंतिम स्वरुप देण्यासाठी प्रत्येक जिल्हयाची आवश्यक असलेली माहिती विहित प्रपत्रामध्ये प्राप्त व्हावी म्हणून विवरणपत्र **१ ते ५ विवरणपत्रे** विहित केलेली आहेत. सदर विवरणपत्रात विहित माहिती शासनास सादर करण्यात यावी.

१२) आदिवासी घटक कार्यक्रमाची आखणी व अंमलबजावणी प्रभावीपणे करण्यासाठी प्रत्येक जिल्ह्यासाठी खालील बाबींचा समावेश असलेली स्वयंस्पष्ट टिप्पणी राज्यस्तरीय बैठकीपुर्वी शासनास सादर करावी. तसेच जिल्हा आराखडा तयार करताना खालील बाबींना प्राधान्य देवून नियोजन करण्यात यावे.

I. आदिवासी विकास विभागाच्या आश्रमशाळांकरिता जोडरस्ते नाहीत अशा शाळा व या करिता जिल्हा आराखडा नियोजनामध्ये केलेली तरतूद.
II. बारमाही जोडरस्ते नसलेली आदिवासी बहुल गावे/वाडया /पाडे. सदर गावे /वाडया/पाडे बारमाही रस्त्यांनी जोडण्यासाठी केलेली गावनिहाय तरतूद.

III. आश्रमशाळांना बारमाही नळ पाणीपुरवठा सोय उपलब्ध नसल्यास बारमाही पाणीपुरवठयासाठी शाळानिहाय नियोजन व तरतूद.

IV. नळपाणीपुरवठा सोय नसलेली आदिवासी गावे, वाडया व पाडे. अशा गावांना नळ पाणी पुरवठा करण्यासाठी केलेली तरतूद .( गाव,वाडया/पाडे यांच्या यादीसह )

V. आदिवासी क्षेत्रातील प्राथमिक आरोग्य केंद्र / उपकेंद्र येथे आवश्यक सुविधा उपलब्ध आहेत किंवा कसे, नसल्यास त्याबाबत केलेली तरतूद / उपाययोजना.

VI. आश्रमशाळांना औषधे उपलब्ध करणे, तसेच विदयार्थ्याची नियमित आरोग्य तपासणी करणे, आश्रमशाळांमध्ये ANM सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी केलेली तरतूद, अशा सेवा मिळत नसल्यास त्याची कारणे व नियोजन

VII. विजपुरवठा न झालेली आदिवासी बहुल गावे /वाडया /पाडे यांची संख्या व सदर गाव/वाडया/पाडे यांना विजपुरवठा करणेसाठी केलेली तरतूद.

VIII. घरगुती वापरांसाठी विज कनेक्शन न मिळालेली आदिवासी कुटुंबे, तसेच कृषीवापरा करिता विज कनेक्शन न मिळालेले आदिवासी शेतकरी अशा सर्व शेतकरी / कुटुंबांना विज जोडणी करणेसाठी केलेले नियोजन व तरतूद

IX. वनहक्क कायद्यांतर्गत वनपट्टे मिळालेल्या आदिवासी खातेदारांच्या जमीन सुधारणेसाठी तसेच त्यांना विहीर/पंप/इंजिन /अन्य कृषी औजारे उपलब्ध करुन देण्यासाठी केलेले नियोजन व तरतूद.

X. आतापर्यंत आदिवासी जिल्हा वार्षिक उपयोजनेंतर्गत नाविन्यपूर्ण योजनेमधुन हाती घेण्यात आलेले नाविन्यपूर्ण उपक्रम व त्याची फलनिष्पती बाबत तपशील

XI. शासकीय आश्रमशाळा / अनुदानीत आश्रमशाळा/ वसतीगृहे / शालेय शिक्षण विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या शाळा इ. ची सांख्यिकीय माहिती.

XII. विशेष केंद्रीय सहाय्य आणि भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५ (१) अंतर्गत राबविण्यात येत असलेल्या/ येणाऱ्या योजनांबाबतची माहिती.

XIII. सन २०१७-१८ चा प्रत्यक्ष खर्च व सन २०१८-१९ चा अपेक्षित खर्चाचा विहित नमुन्यातील तपशील.

XIV. याशिवाय काही अतिरिक्त मुद्दयांची आवश्यकता भासल्यास त्याबाबतची माहिती.

**४.** सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून अर्थसंकल्पामधील योजनेतर व योजनांतर्गत असे खर्चाचे वर्गीकरण रद्द होवून नविन प्रणालीमध्ये महसुली खर्च (मागणी क्र. टी-९), भांडवली खर्च (मागणी क्र.टी-१०) व कर्जे/ऋण (मागणी क्र.टी-११) असे वर्गीकरण करण्यात आलेले आहे. यानुसार, जिल्ह्यांनी यापुढे जिल्हा नियतव्यय वाटपाबाबत, खर्चाच्या अहवालाबाबत तसेच इतर प्रकारचे अहवाल सादर करताना

आवश्यक ठिकाणी जिल्ह्याच्या खर्चांचे महसुली खर्च, भांडवली खर्च व कर्जे/ऋण असे वर्गीकरण सुध्दा दर्शविण्यात यावे.

**५.** सर्व संबंधितांना सूचित करण्यात येते की, वर उल्लेखिलेल्या मार्गदर्शक सूचना लक्षात घेऊन जिल्हयांच्या योजनांबाबतचा आराखडा तयार करण्यात यावा. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत "मागासवर्गीय कल्याण" या शिर्षाखाली जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याची व संनियंत्रणाची जबाबदारी संबधित प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांची राहिल. तर आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत इतर विकास शिर्षाची जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी यांच्या नियंत्रणाखाली संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांची राहील. जिल्हा आदिवासी उपयोजना समिती /जिल्हा नियोजन समितीने संमत केलेल्या जिल्हा योजनेच्या प्रस्तावाच्या १० प्रती आदिवासी विकास विभागाकडे दिनांक ०२ डिसेंबर, २०१८ पर्यंत पाठविण्यात याव्यात .

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२९१२५६३८२३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.10.31 15:35:43 +05'30'

**(रविंद्र दि.औटे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती

प्रत, अग्रेषित

२. मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई
३. मा.मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८. सर्व अपर मुख्य सचिव / सर्व प्रधान सचिव / सचिव मंत्रालयीन विभाग

९. प्रधान सचिव (नियोजन विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई.
१०.सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ, बी-२३/ए, साउथ अंबाझरी मार्ग, अंध विद्यालयाजवळ, नागपूर
११.सदस्य सचिव,मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, जिल्हाधिकारी कार्यालय कंपाऊड, तळमजला,औरंगाबाद-४३१००१
१२.सदस्य सचिव,उर्वरित महाराष्ट्र वैद्यानिक विकास मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, १८,वा मजला, (पश्चिम बाजू) मंत्रालयासमोर,मुंबई-३२
१३.कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, १९ वा मजला, (पश्चिम बाजू), मुंबई
१४.सर्व विभागीय आयुक्त
१५.आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक
१६. सर्व अपर आयुक्त,आदिवासी विकास
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ,नाशिक.
१८.संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई.
१९.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
२०. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२१.सर्व जिल्हा नियोजन अधिकारी.
२२.सर्व सहसचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, आ.वि.वि, मंत्रालय,मुंबई.
२३. नियोजन विभाग (का-१४११)/ वित्त विभाग (व्यय-१४/ अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई.
२४.निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

## परिशिष्ट -अ

## जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम सन २०१९-२० करीता नियतव्यय वाटप

<table>
<tr><td colspan="3">आदिवासी घटक कार्यक्रम सन २०१९-२० करीता आधारभुत नियतव्यय रुपये ८९६९.०५ कोटी</td></tr>
<tr><td colspan="3">विभागाच्या आस्थापनाविषयक व बांधील स्वरुपाच्या योजनांना आवश्यक नियतव्यय रू.३४५७.१५ कोटी वजा जाता उर्वरीत इतर विकासात्मक योजनांकरीता शिल्लक राहणारा नियतव्यय रू. ५५११.९० कोटी एवढया नियतव्ययापैकी पेसा ग्रामपंचायतींना थेट अनुदान ५% नियतव्यय वगळता जिल्हास्तर (४० टक्के) व राज्यस्तर (५५ टक्के) योजनांकरीता नियतव्यय वाटप खालीलप्रमाणे प्रस्तावित करण्यात येत आहे.</td></tr>
<tr><td colspan="2">जिल्हास्तर</td><td>राज्यस्तर</td></tr>
<tr><td colspan="2">रु. २२०४.७६ कोटी</td><td>रु. ३०३१.५४ कोटी</td></tr>
<tr><td colspan="2">जिल्हास्तरीय नियतव्ययाचे वाटप खालीलप्रमाणे दोन क्षेत्रात करण्यात येत आहे.</td><td></td></tr>
<tr><td>टिएसपी (८५%)</td><td>ओटिएसपी (१५%)</td><td></td></tr>
<tr><td>रुपये १८७४.०४ कोटी</td><td>रुपये ३३०.७२ कोटी</td><td></td></tr>
<tr><td>आदिवासी क्षेत्रावर आधारीत ८०% व आदिवासी लोकसंख्येवर आधारीत २० % नियतव्यय निश्चित करण्यात आला असून या अंतर्गत मुलभूत सुविधा व वैयक्तिक लाभाच्या योजना हाती घेता येतील.</td><td>आदिवासी लोकसंख्येवर आधारीत नियतव्यय निश्चित करण्यात आला असून या अंतर्गत वैयक्तिक व कौटूंबिक लाभाच्या योजना हाती घेता येतील.</td><td></td></tr>
</table>

# परिशिष्ट -ब

## जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम २०१९-२० करीता जिल्हानिहाय कमाल नियतव्यय मर्यादा

(रू.लाखात)

| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | टिएसपी व एटीएसपी | माडा व मिनिमाडा नियतव्यय | ओटिएसपी नियतव्यय | एकूण नियतव्यय |
|---|---|---|---|---|---|
| १ | मुंबई उपनगर | ०.०० | ०.०० | ६८४.५८ | ६८४.५८ |
| २ | मुंबई शहर | ०.०० | ०.०० | १६४.२९ | १६४.२९ |
| ३ | पालघर | ३२१२५.६५ | ०.०० | ६२५.९४ | ३२७५१.५९ |
| ४ | ठाणे | ६८२५.२६ | ३४१.९५ | १५४४.४८ | ८७११.६९ |
| ५ | रायगड | ९०६.०६ | १५६८.०६ | १५६५.४४ | ४०३९.५५ |
| ६ | रत्नागिरी | ०.०० | ०.०० | १३३.३९ | १३३.३९ |
| ७ | सिंधुदूर्ग | ०.०० | ०.०० | ४५.६७ | ४५.६७ |
| ८ | नाशिक | २९६९४.९९ | ९७२.८१ | ४१००.८५ | ३४७६८.६६ |
| ९ | धुळे | १०१६७.८५ | ०.०० | २०८२.९६ | १२२५०.८१ |
| १० | नंदूरबार | ३२५०५.४५ | ०.०० | ४५१.७२ | ३२९५७.१८ |
| ११ | जळगांव | १८९९.६९ | ०.०० | ३५४६.६९ | ५४४६.३८ |
| १२ | अहमदनगर | ३६९४.२५ | १९८.९४ | १७४२.८७ | ५६३६.०७ |
| १३ | पुणे | ३३०७.२५ | ५११.०८ | १६१८.५५ | ५४३६.८९ |
| १४ | सातारा | ०.०० | ०.०० | १९४.०३ | १९४.०३ |
| १५ | सांगली | ०.०० | ०.०० | १२०.०३ | १२०.०३ |
| १६ | सोलापूर | ०.०० | ०.०० | ५०८.०२ | ५०८.०२ |
| १७ | कोल्हापूर | ०.०० | ०.०० | १९७.७७ | १९७.७७ |
| | **उर्वरीत महाराष्ट्र** | **१२११२६.४५** | **३५९२.८५** | **१९३२७.३०** | **१४४०४६.६०** |
| १८ | बुलढाणा | ०.०० | ११३८.८९ | ६००.८१ | १७३९.७० |
| १९ | अकोला | ०.०० | ९९५.०६ | ४८६.५२ | १४८१.५८ |
| २० | वाशिम | ०.०० | ८७२.७६ | ३८९.६० | १२६२.३५ |
| २१ | अमरावती | ७५९०.४३ | ११६७.९३ | ९१४.७५ | ९६७३.११ |
| २२ | यवतमाळ | ८३९३.६१ | २०६३.३७ | १७२०.१४ | १२१७७.११ |
| २३ | नागपूर | १४२२.४९ | १३३२.६१ | २४३१.८४ | ५१८६.९४ |

| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | टिएसपी व एटीएसपी | माडा व मिनिमाडा नियतव्यय | ओटिएसपी नियतव्यय | एकूण नियतव्यय |
|---|---|---|---|---|---|
| २४ | वर्धा | ०.०० | ८०८.९४ | ८६८.५८ | १६७७.५२ |
| २५ | भंडारा | ०.०० | ५२६.०२ | ४९६.२९ | १०२२.३२ |
| २६ | गोंदिया | ४४५२.३२ | ५६७.७३ | ६१३.९६ | ५६३४.०१ |
| २७ | चंद्रपूर | ७३७८.७६ | १५७२.५५ | ११३४.१७ | १००८५.४९ |
| २८ | गडचिरोली | १६३१२.७५ | ०.०० | २५०.०५ | १६५६२.८० |
| | **विदर्भ** | **४५५५०.३५** | **११०४५.८५** | **९९०६.७२** | **६६५०२.९३** |
| २९ | औरंगाबाद | ०.०० | ०.०० | ९३८.६६ | ९३८.६६ |
| ३० | जालना | ०.०० | ०.०० | २७६.७१ | २७६.७१ |
| ३१ | बीड | ०.०० | ०.०० | २१४.२४ | २१४.२४ |
| ३२ | परभणी | ०.०० | ०.०० | २६५.२६ | २६५.२६ |
| ३३ | हिंगोली | ०.०० | १८४६.९७ | ३७३.१२ | २२२०.०९ |
| ३४ | नांदेड | २९११.२९ | १३३०.८३ | ११५७.०६ | ५३९९.१८ |
| ३५ | उस्मानाबाद | ०.०० | ०.०० | २३५.९६ | २३५.९६ |
| ३६ | लातुर | ०.०० | ०.०० | ३७६.३९ | ३७६.३९ |
| | **मराठवाडा** | **२९११.२९** | **३१७७.८०** | **३८३७.३८** | **९९२६.४७** |
| | **एकुण राज्य** | **१६९५८८.०९** | **१७८१६.५१** | **३३०७१.४०** | **२२०४७६.००** |

# परिशिष्ट-क

## जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम २०१९-२० प्रकल्प निहाय नियतव्यय वाटप

(रू.लाखात)

| अ.क्र. | प्रकल्पाचे नांव | जिल्ह्याचे नाव | टिएसपी व एटीएसपी | माडा व मिनिमाडा नियतव्यय | ओटिएसपी नियतव्यय | एकूण नियतव्यय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | **मुंबई** | मुंबई उपनगर | ०.०० | ०.०० | ६८४.५८ | ६८४.५८ |
| | | मुंबई शहर | ०.०० | ०.०० | १६४.२९ | १६४.२९ |
| | एकूण मुंबई | | ०.०० | ०.०० | ८४८.८८ | ८४८.८८ |
| २ | **डहाणु** | पालघर | १८२४७.८५ | ०.०० | ६२५.९४ | १८८७३.७९ |
| ३ | **जव्हार** | | १३८७७.८० | ०.०० | ०.०० | १३८७७.८० |
| ४ | **शहापूर** | ठाणे | ६८२५.२६ | ३४१.९५ | १५४४.४८ | ८७११.६९ |
| ५ | **पेण** | रायगड | ९०६.०६ | १५६८.०६ | १५६५.४४ | ४०३९.५५ |
| | | रत्नागीरी | ०.०० | ०.०० | १३३.३९ | १३३.३९ |
| | | सिंधुदूर्ग | ०.०० | ०.०० | ४५.६७ | ४५.६७ |
| | एकूण पेण | | ९०६.०६ | १५६८.०६ | १७४४.५० | ४२१८.६२ |
| ६ | **नाशिक** | नाशिक | १६६९०.४१ | ७१४.८१ | २३०२.५० | १९७०७.७२ |
| ७ | **कळवण** | | १३००४.५८ | २५८.०० | १७९८.३५ | १५०६०.९३ |
| ८ | **धुळे** | धुळे | १०१६७.८५ | ०.०० | २०८२.९६ | १२२५०.८१ |
| ९ | **नंदूरबार** | नंदूरबार | १६९५९.५५ | ०.०० | ४५१.७२ | १७४११.२७ |
| १० | **तळोदा** | | १५५४५.९० | ०.०० | ०.०० | १५५४५.९० |
| ११ | **यावल** | जळगांव | १८९९.६९ | ०.०० | ३५४६.६९ | ५४४६.३८ |
| १२ | **राजूर** | अहमदनगर | ३६९४.२५ | १९८.९४ | १७४२.८७ | ५६३६.०७ |
| १३ | **घोडेगाव** | पुणे | ३३०७.२५ | ५११.०८ | १६१८.५५ | ५४३६.८९ |
| | | सातारा | ०.०० | ०.०० | १९४.०३ | १९४.०३ |
| | | सांगली | ०.०० | ०.०० | १२०.०३ | १२०.०३ |
| | | कोल्हापूर | ०.०० | ०.०० | १९७.७७ | १९७.७७ |
| | एकूण घोडेगाव | | ३३०७.२५ | ५११.०८ | २१३०.३८ | ५९४८.७१ |

| अ.क्र. | प्रकल्पाचे नांव | जिल्ह्याचे नाव | टिएसपी व एटीएसपी | माडा व मिनिमाडा नियतव्यय | ओटिएसपी नियतव्यय | एकुण नियतव्यय |
|---|---|---|---|---|---|---|
| १४ | **सोलापूर** | सोलापूर | ०.०० | ०.०० | ५०८.०२ | ५०८.०२ |
| | | उस्मानाबाद | ०.०० | ०.०० | २३५.९६ | २३५.९६ |
| | एकूण सोलापूर | | ०.०० | ०.०० | ७४३.९७ | ७४३.९७ |
| १५ | **अकोला** | बुलढाणा | ०.०० | ११३८.८९ | ६००.८१ | १७३९.७० |
| | | अकोला | ०.०० | ९९५.०६ | ४८६.५२ | १४८१.५८ |
| | | वाशिम | ०.०० | ८७२.७६ | ३८९.६० | १२६२.३५ |
| | एकूण अकोला | | ०.०० | ३००६.७० | १४७६.९३ | ४४८३.६३ |
| १६ | **धारणी** | अमरावती | ७५९०.४३ | ११६७.९३ | ९१४.७५ | ९६७३.११ |
| १७ | **पांढरकवडा** | यवतमाळ | ७२३९.०१ | ५२४.०३ | ९३५.८८ | ८६९८.९१ |
| १८ | **पुसद** | | ११५४.६० | १५३९.३४ | ७८४.२६ | ३४७८.१९ |
| १९ | **नागपूर** | नागपूर | १४२२.४९ | १३३२.६१ | २४३१.८४ | ५१८६.९४ |
| | | वर्धा | ०.०० | ८०८.९४ | ८६८.५८ | १६७७.५२ |
| | एकूण नागपूर | | १४२२.४९ | २१४१.५५ | ३३००.४३ | ६८६४.४७ |
| २० | **भंडारा** | भंडारा | ०.०० | ५२६.०२ | ४९६.२९ | १०२२.३२ |
| २१ | **देवरी** | गोंदिया | ४४५२.३२ | ५६७.७३ | ६१३.९६ | ५६३४.०१ |
| २२ | **चंद्रपूर** | चंद्रपूर | ४१३६.२९ | ९८२.५२ | ७०७.५४ | ५८२६.३५ |
| २३ | **चिमूर** | | ३२४२.४७ | ५९०.०३ | ४२६.६३ | ४२५९.१४ |
| २४ | **अहेरी** | गडचिरोली | ३५१५.०४ | ०.०० | ५.७५ | ३५२०.७९ |
| २५ | **भामरागड** | | ४७८७.०५ | ०.०० | ०.०० | ४७८७.०५ |
| २६ | **गडचिरोली** | | ८०१०.६६ | ०.०० | २४४.३१ | ८२५४.९६ |
| २७ | **औरंगाबाद** | औरंगाबाद | ०.०० | ०.०० | ९३८.६६ | ९३८.६६ |
| | | जालना | ०.०० | ०.०० | २७६.७१ | २७६.७१ |
| | | बीड | ०.०० | ०.०० | २१४.२४ | २१४.२४ |
| | | लातुर | ०.०० | ०.०० | ३७६.३९ | ३७६.३९ |
| | एकूण औरंगाबाद | | ०.०० | ०.०० | १८०६.०० | १८०६.०० |

| अ.क्र. | प्रकल्पाचे नांव | जिल्ह्याचे नाव | टिएसपी व एटीएसपी | माडा व मिनिमाडा नियतव्यय | ओटिएसपी नियतव्यय | एकूण नियतव्यय |
|---|---|---|---|---|---|---|
| २८ | **कळमनूरी** | परभणी | ०.०० | ०.०० | २६५.२६ | २६५.२६ |
| | | | | | | |
| | | हिंगोली | ०.०० | १८४६.९७ | ३७३.१२ | २२२०.०९ |
| | एकूण कळमनूरी | | ०.०० | १८४६.९७ | ६३८.३७ | २४८५.३४ |
| २९ | **किनवट** | नांदेड | २९११.२९ | १३३०.८३ | ११५७.०६ | ५३९९.१८ |
| | **एकुण राज्य** | | **१६९५८८.०९** | **१७८१६.५१** | **३३०७१.४०** | **२२०४७६.००** |

# परिशिष्ट-ड

## जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम सन २०१९-२० नियतव्यय वाटपबाबत मार्गदर्शक सुचना.

१. आदिवासी विकास विभागाच्या *दि.२५.१०.२०१८* रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार सन २०१९-२० जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम प्रारुप आराखडा तयार करताना नियतव्यय वाटप करण्याकरीता खालील प्रमाणे वर्गीकरणानुसार उपविकास क्षेत्राचा समावेश गाभा क्षेत्र व बिगर गाभा क्षेत्रामध्ये करण्यात यावा व याकरीता जिल्हयास प्राप्त नियतव्ययांपैकी अनुक्रमे **३/४** व **१/४** या प्रमाणात नियतव्यय प्रस्तावित करण्यात यावा.

| **गाभा क्षेत्र (एकूण नियतव्ययाच्या ३/४ )** | **बिगर गाभा क्षेत्र (एकूण नियतव्ययाच्या १/४ )** |
|---|---|
| १.मागासवर्गीय कल्याण (विशेष क्षेत्र) | १.नगर विकास |
| २. ग्रामविकास | २.पर्यटन व वन पर्यटन |
| ३.कृषी,फलोत्पादन, पशुसंवर्धन,मत्स्यसंवर्धन, वने | ३.सहकार व वस्त्रोद्योग |
| ४.शालेय शिक्षण, क्रीडा व युवक कल्याण, उच्च व तंत्र शिक्षण व कौशल्य विकास | ४.वैद्यकीय शिक्षण |
| ५. ग्रामीण पाणीपुरवठा व स्वच्छता | ५. जलसंपदा |
| ६. आरोग्य | ६.रस्ते व पुल विकास, सार्वजनिक बांधकाम |
| ७. महिला व बालविकास- पोषण,अंगणवाडी बांधकाम | ७. उद्योग व उर्जा |
| ८.जलसंधारण/लघुपाटबंधारे. | ८.नाविण्यपूर्ण योजना, मुल्यमापन व संनियंत्रण |

२. जिल्हा आदिवासी घटक कार्यक्रम तयार करतांना आदिवासी उपयोजना क्षेत्र (अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रासह) आणि माडा व मिनीमाडा क्षेत्र तसेच आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रातील (ओटिएसपी) वैयक्तीक व कौटुंबिक लाभाच्या योजनेकरीता निश्चित अशी तरतूद संबंधित विकास क्षेत्राखाली स्वतंत्रपणे दाखविण्यात यावी. ज्या जिल्ह्यात आदिवासी उपयोजना क्षेत्र आणि माडा / मिनीमाडा क्षेत्र नसेल अशा जिल्ह्यामध्ये सुध्दा ओटिएसपी क्षेत्राकरीता आवश्यक तेवढ्या प्रमाणात तरतूदी करण्यात यावी. व **याबाबतचा खर्च स्वतंत्रपणे दर्शविण्यात यावा.**

**३.** जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम २०१९-२० अंतर्गत योजनांची निवड व नियतव्यय वाटप करताना खालील मार्गदर्शक सुचना विचारात घेण्यात याव्यात.

१) **<u>कामांची निवड -</u>**

I. कामनिहाय नियोजन होण्यासाठी जिल्हा योजनेंतर्गत घेण्यात येणाऱ्या सर्व कामांची यादी व त्यावरील खर्चाचा तपशील प्रस्तावासोबत जोडावा. तसेच सदर माहिती योजना प्रणाली (MP-SIMS) मध्येही भरण्यात यावी. सामान्यत: कोणत्याही योजनेला त्या योजनेअंतर्गत घ्यावयाची कामे निश्चित असल्याशिवाय नियतव्यय ठेवण्यात येवू नये

II. **जिल्हा वार्षिक योजनेतून घेण्यात येणारी कामे २ वर्षाच्या कालावधीत पूर्ण करणे आवश्यक आहे.** त्यादृष्टीने कामाचे नियोजन तसेच निधीची तरतूद करण्यात यावी. योजनेचा आराखडा तयार करताना चालू कामांच्या उर्वरीत खर्चाच्या तरतूदीबाबत प्राथम्याने विचार करण्यात यावा. अपूर्ण कामांमध्ये ७५% व त्यापेक्षा अधिक पूर्ण, ५०% ते ७४% पूर्ण आणि ५०% पेक्षा कमी पूर्ण असे वर्गीकरण करुन त्याक्रमाने कामे पूर्ण करण्याचे नियोजन करावे, जेणेकरुन वितरीत निधी अखर्चीत राहणार नाही.

III. जिल्हा आराखड्यात प्रस्तावित केलेल्या नियतव्यय मर्यादेतून अपूर्ण कामे पूर्ण करण्यासाठी लागणारा निधी वजा करुन उर्वरीत नियतव्यय रक्कमेच्या दीड पट रक्कमेच्या मर्यादेतीलच नवीन कामे प्रस्तावित करण्यात यावीत. नवीन कामे/ बांधकामांचा समावेश योजनेत करण्यापूर्वी प्रशासकीय मान्यता असल्याची खात्री करावी.

२) **<u>केंद्र पुरस्कृत योजना-</u>**

केंद्र पुरस्कृत योजनांना जिल्हास्तरावरुन राज्य हिस्स्याची तरतुद करण्यात येत असलेल्या योजनांतर्गत आवश्यक नियतव्यय प्रस्तावित करण्याची दक्षता संबंधित योजनेची अंमलबजावणी करणाऱ्या विभागाचे जिल्हा प्रमुख व जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.याकरीता केंद्र शासनाकडून मंजुर वार्षिक आराखडयानुसार आवश्यक राज्य हिस्स्याकरीता नियतव्यय मागणी करण्याची जबाबदारी संबंधित विभागाच्या जिल्हाप्रमुखांची राहील. आणि सदर प्रयोजनाकरीता प्राधान्याने नियतव्यय राखून ठेवण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील.

३) **<u>नाविन्यपूर्ण योजना-</u>**

या योजनेंतर्गत आदिवासी विकास विभागाच्या दि.२०.०६.२०१४ च्या शासन निर्णयामधील मार्गदर्शक सूचनांनुसार उपक्रम हाती घेण्यात यावेत. या करीता जिल्ह्याकरीता उपलब्ध एकूण नियतव्ययाच्या कमाल २ टक्के तरतूद करण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत केंद्र अथवा राज्यस्तरावर सद्यस्थितीत अस्तित्वात असलेल्या कोणत्याही योजनांना नाविन्यपूर्ण योजनांमधून तरतूद उपलब्ध करुन देण्यात येवू नये. नाविन्यपूर्ण किंवा

अन्य अबांधील स्वरूपातील निधीच्या माध्यमातून अस्तित्वात असलेल्या योजनांमधून न करता येणाऱ्या कामांसाठी/ योजनांसाठी सदरचा निधी गॅप फिलींग म्हणून वापरण्यात यावा. सदर योजनेअंतर्गत आदिवासी लाभार्थ्यांना लाभ मिळण्याच्या अनुषंगाने नाविन्यपूर्ण उपक्रम राबविण्यात यावेत. याकरीता संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी समन्वय अधिकारी म्हणून आवश्यक कार्यवाही करावी.

४) **मुल्यमापन व संनियंत्रणः-**

नियोजन विभागाच्या दि.२७/०८/२०१४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदींच्या धर्तीवर आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मुल्यमापन, संनियंत्रण व उपयुक्तता तपासण्यासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षापासुन एकुण नियतव्ययाच्या ०.५ टक्के तरतुद करण्याची बाब विचाराधीन असुन त्या अनुषंगाने जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेस **प्राप्त नियतव्ययाच्या ०.५ टक्के** नियतव्यय मुल्यमापन, संनियंत्रण व उपयुक्तता तपासणे यासाठी राखून ठेवण्यात यावा. प्रकरणी जिल्हाधिकारी हे नियंत्रण अधिकारी व संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास हे समन्वय अधिकारी असतील. याकरीताच्या मार्गदर्शक सुचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

४. राज्याच्या महत्वपुर्ण योजनांना नियतव्यय प्रस्तावित करण्याच्या अनुषंगाने खालील सुचना विचारात घेण्यात याव्यात.

१) **डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजना -**

जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१५-१६ पासुन डॉ. ए.पी.जे अब्दुल कलाम अमृत आहार योजना राबविण्यात येत आहे. यापूर्वी जिल्हा उपयोजनेंतर्गत "पोषण" या उपविकास शिर्षाखाली अंगणवाडीतील बालकांच्या पोषणाकरीता लेखाशिर्ष २२३६ ०२९७ खाली तरतूद उपलब्ध करुन देण्यात येत होती. तद्नंतर विभागाच्या दिनांक १४.०३.२०१७ च्या शासन निर्णयानुसार सन २०१७-१८ पासुन जिल्ह्यांना महसुली व भांडवली खर्चाकरीता जिल्हानिहाय स्वतंत्र लेखाशिर्ष उपलब्ध करून देण्यात आल्याने व योजनांना नविन उपशीर्ष सांकेतांक उपलब्ध करून देण्यात आलेले असुन पूर्वीच्या "पोषण" या योजनेकरीता TX२९०००१ व डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजनेकरीता TX२९०००४ असे उपशीर्ष सांकेतांक उपलब्ध करून देण्यात आलेले आहेत. परंतु, आता जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येत असलेल्या डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजनेत पोषणाविषयीचे सर्वच घटक अंतर्भूत असल्याने सन २०१९-२० पासून डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजनेसाठी (टप्पा-१ व टप्पा-२) केवळ TX२९०००४ याच उपशीर्ष सांकेतांकाखाली जिल्हा आराखड्यामध्ये निधी प्रस्तावित करण्यात यावा. तसेच राज्य शासनाने चालू केलेल्या डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजना, ग्राम बालविकास केंद्र अशा महत्त्वपूर्ण योजनांकरीता राज्यशासनाने जिल्हानिहाय विहित करून दिलेली तरतूद प्राधान्याने करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील.

२) **"बिरसा मुंडा कृषी क्रांती योजना" -**

कृषी विभाग, शासन निर्णय दिनांक ०९.०८.२०१७ आणि दि.३०.१२.२०१७ अन्वये सुधारित आदिवासी उपयोजना ( बिरसा मुंडा कृषी क्रांती योजना) राबविण्यास मान्यता देण्यात आली असून यामध्ये जिल्हा वार्षिक घटक कार्यक्रमांतर्गत "मागासवर्गीय कल्याण" या उपविकास शिर्षाखाली यापूर्वी स्वतंत्र तरतुद करण्यात येत असलेल्या "विज पंप/तेल पंप संच बसविणे व पिव्हीसी/एचडीपीई पाईप पुरवठा" या योजना अंतर्भुत करण्यात आलेल्या आहेत. तरी "मागासवर्गीय कल्याण" या उपविकास क्षेत्रांतर्गत "विद्युत पंप संच बसविणे (TT२४०००१-TSP व TT२४००१०-OTSP)", "ऑइल इंजिन पंप पुरविणे (TT२४०००२-TSP व TT२४००११-OTSP)" तसेच "पिव्हीसी/एचडीपीई पाईप (TT२४००२३-TSP व TT२४००२७-OTSP)" या उपशिर्षाखाली निधी प्रस्तावित करू नये. सदर योजनांखालील अपेक्षित लाभार्थ्यांच्या प्रमाणात आवश्यक असलेला निधी यापुढे "बिरसा मुंडा कृषी क्रांती योजना" अंतर्गत TD०३०००२-TSP व TD०३०००१- OTSP या उपशिर्षाखाली प्रस्तावित करण्यात यावा.

३) **शासकीय आश्रमशाळा व वसतीगृह दुरुस्ती:-**

शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहांच्या सुविधांबाबत वेळोवेळी न्यायालयीन प्रकरणे उद्भवतात. यानुषंगाने न्यायालयाने सुध्दा आश्रमशाळा व वसतीगृहांना प्राथम्याने मुलभूत सुविधा पुरविण्याचे निर्देश दिलेले आहेत. तसेच वॉश कार्यक्रमांतर्गत पाणीपुरवठा, शौचालय दुरूस्ती, स्नानगृह दुरूस्ती अशी कामे सर्व आश्रमशाळांमध्ये पूर्ण करावयाची आहेत. त्या बाबींचा विचार करता ज्या शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहांना जिल्हा आदिवासी घटक कार्यक्रमातून निधी उपलब्ध करून देण्यात येतो त्यांना एकुण सोयी सुविधा पुरविण्याबाबत तसेच त्यांच्या एकुण निधी मागणीस अनुसरून प्राथम्याने व जास्तीत जास्त निधी उपलब्ध करून द्यावा.

४) **आदिम जमाती व पारधी विकास योजना-**

ज्या जिल्ह्यात आदिम जमातीच्या लोकांची वस्ती आहे, अशा जिल्ह्यात उदा. ठाणे, पालघर व रायगड जिल्हा (कातकरी), गडचिरोली जिल्हा (माडीया गोंड), यवतमाळ व नांदेड जिल्हा (कोलाम) या जिल्ह्यातील आदिवासी घटक कार्यक्रमात नियोजन समितीने या आदिम जमातीच्या जलद विकासाकरीता वैयक्तिक अथवा कौटुंबिक लाभाच्या योजनांची तसेच मुलभूत विकासाच्या योजनांची आखणी करुन त्याकरीता त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात अग्रक्रमाने आवश्यक नियतव्यय जिल्हा आदिवासी घटक कार्यक्रमात उपलब्ध करुन द्यावा. त्याचप्रमाणे

आदिम जमातीकरिता केलेल्या तरतुदीची योजनावार माहिती एका परिशिष्टात स्वतंत्ररित्या जोडून आदिवासी घटक कार्यक्रमाच्या आराखड्याबरोबर शासनाला सादर करावी.

पारधी जमातीच्या विकासाकरीता, त्यांची जिल्ह्यातील लोकसंख्या विचारात घेवून त्या प्रमाणात त्यांच्या विकासासाठी असलेल्या कार्यक्रमांसाठी आवश्यक तरतूद प्राधान्याने आदिवासी उपयोजनेमध्ये समाविष्ट करावी. पारधी जमातीकरिता केलेल्या तरतुदीची योजनावार माहिती एका परिशिष्टात स्वतंत्ररित्या जोडून जिल्हा आदिवासी घटक कार्यक्रमाच्या आराखड्याबरोबर शासनाला सादर करावी.

५) रस्ते व पूल-

महाराष्ट्र राज्यातील न जोडलेल्या वाड्या-वस्त्या जोडण्यासाठी व ग्रामीण भागातील दुरावस्था झालेल्या रस्त्यांची दर्जोन्नती करण्यासाठी राज्यात ग्राम विकास विभागाच्या दि.२८.१०.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये "मुख्यमंत्री ग्रामसडक योजना " राबविण्यात येत आहे. **"मुख्यमंत्री ग्रामसडक योजना " हा शासनाचा प्रमुख कार्यक्रम असुन आदिवासी क्षेत्रांतर्गत राबविण्यात येणाऱ्या सदर योजनेची तरतुद जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेंतर्गत प्राथम्याने करण्यात यावी.** प्रकरणी "मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत " घेण्यात येणाऱ्या रस्त्यांकरीता (CMGSY) आवश्यक निधीची मागणी पूर्ण झाल्यानंतरच जिल्ह्यांतर्गत इतर रस्तेविकास कामांची निवड करण्यात यावी. सदर योजनेंतर्गत ग्राम विकास विभागाच्या दि.२८.०१.२०१६ च्या शासन निर्णयान्वये रस्त्यांची निवड करण्यासाठी मा.पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा स्तरावरील समिती गठीत करण्यात आली असून दि. १२.०७.२०१६ च्या शासन निर्णयान्वये सदर समितीमध्ये आदिवासी क्षेत्राकरीता संबंधित प्रकल्प अधिकारी यांचा सदस्य म्हणून समावेश करण्यात आला आहे. तरी सदर समितीमार्फत आश्रमशाळा/ वसतीगृहे, आदिवासी पाडे/ वाड्या/ गावे यांकरीता जोडरस्ते व दर्जोन्नती यांना प्राधान्य देण्यात यावे. या करीता खालील मार्गदर्शक सुचना विचारात घेण्यात याव्यात.

i. आदिवासी क्षेत्रातील रस्त्यांच्या कामामध्ये फक्त लिंकरोड म्हणजे मुख्य रस्त्यापासून गाव जोडणाऱ्या रस्त्यांचा समावेश असावा. त्यामध्ये फक्त सी.डी. वर्क्स, लहान पूल, व लहान मोऱ्या यांचा समावेश असावा. आदिवासी लोकसंख्येच्या उतरत्या क्रमानुसारची

गांवे घेण्यात यावीत. रस्ते जोडण्याच्या कार्यक्रमात बारमाही रस्ते कार्यक्रमाला प्रथम प्राधान्य देण्यात यावे. शिवाय, ज्या आश्रमशाळांना/ प्राथमिक आरोग्य केंद्र/ उपकेंद्रांना जोडरस्ते नाहीत तेथील कामांना अग्रक्रम द्यावा. जिल्हा रस्ते, रस्त्यांचे रुंदीकरण, स्टेट हायवे इ. साठी आदिवासी घटक कार्यक्रमातून निधी देण्यात येऊ नये.

ii. आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्रात माहे मार्च-२०१८ पर्यंत जिल्हानिहाय अर्थसंकल्पीत झालेल्या रस्त्यांसंदर्भात व सन २०१९-२० मध्ये करावयाच्या कामांचा प्राधान्यक्रम सुरुवातीस निश्चित करण्यात यावा तसेच प्राध्यान्य क्रमानुसार नविन कोणती कामे यादीत घ्यावयाची आहेत त्यास लागणारा निधी याबाबत स्वतंत्र विवरणपत्र देण्यात यावे.

**६) लघु पाटबंधारे योजना (१०१ ते २५० हेक्टर)-**

जलसंपदा विभाग व जलसंधारण विभागामार्फत जिल्हास्तरावर करण्यात येणारी १०० हेक्टरच्या वरील लघु पाटबंधाऱ्यांची कामे ही योजना सन २०१६-१७ पासून जिल्हास्तरावरून राज्यस्तरावर वर्ग करण्यात आलेली आहे. तथापि, सन २०१६-१७ पूर्वी जिल्हास्तरावर योजना सूरू असताना मंजूर प्रशासकीय मान्यतेपैकी फक्त उर्वरीत दायित्वाकरीता निधी प्रस्तावित करण्यात यावा. याशिवाय कोणत्याही १०० हेक्टर वरील नवीन कामांकरीता मान्यता देण्यात येवु नये.

**७) शासकीय निवासी/कार्यालयीन इमारत बांधकाम व दुरुस्तीः-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.१९.०९.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजना योजनेप्रमाणे जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेतर्गत अनुसूचित क्षेत्रातील जिल्ह्यासाठी शासकिय निवासी इमारती व कार्यालयीन इमारतींचे बांधकाम व दुरुस्ती यासाठी आवश्यक निधी जिल्हास्तरावर अर्थसंकल्पित करण्याच्या अनुषंगाने स्वतंत्र लेखाशिर्ष /योजना उपलब्ध करुन देण्यात येत असुन त्या अंतर्गत नियतव्यय प्रस्तावित करण्यात यावा.

५. आदिवासी उपयोजनेमधून आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रम, डोंगरी विकास कार्यक्रम, रोजगार हमी योजना व संसद आदर्श ग्राम योजनाकरिता जिल्हा आदिवासी उपयोजनेतुन

तरतूदी ठेवण्याची आवश्यकता नाही. त्यामुळे या कार्यक्रमासाठी नियतव्यय देण्यात येऊ नये. यासाठीचा नियतव्यय सर्वसाधारण योजनेतून उपलब्ध करुन घेण्यात यावा.

६. **"मागासवर्गीयांचे कल्याण" (विशेष क्षेत्र)** या विकासशिर्षाखाली येणाऱ्या जिल्हास्तरावरील योजनांना आवश्यक नियतव्यय प्राधान्याने उपलब्ध करून घेण्यात यावा.

७. जिल्हयातील संवेदनशील/ दुर्गम तालुक्यांकरीता इतर तालुक्यांपेक्षा वाढीव नियतव्यय प्राधान्याने उपलब्ध करून देण्यात यावा.

८. आदिवासी उपयोजनाक्षेत्राकरीता (TSP) उपलब्ध झालेल्या तरतुदीमध्ये वैयक्तिक व कौटुंबिक लाभाच्या योजनांकरिता २०% व त्या क्षेत्रातील पायाभूत सुविधा निर्माण करण्याकरिता योजनांवर ८०% या प्रमाणे शासनाच्या धोरणानुसार खर्च करावयाचा आहे. म्हणून त्या दृष्टीने आवश्यक तेवढा निधी उपलब्ध करुन देण्याची दक्षता घेण्यात यावी. या शिवाय जिल्ह्यातील आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्र ओटीएसपीसाठी ठरवून देण्यात आलेल्या नियतव्ययातून आदिवासींच्या फक्त वैयक्तिक अथवा कौटुंबिक लाभाच्या योजनांकरिता फलदायी व निवडक योजनांसाठी नियतव्यय दिला जाईल, याची दक्षता घेण्यात यावी.

९. सर्व अंमलबजावणी अधिकाऱ्यांनी नियोजन समितीने मान्य केलेल्या योजनांवरील प्रत्यक्ष खर्चावर आधारित मासिक खर्चाचे विवरणपत्र संबंधित विभाग प्रमुख /प्रशासकीय विभागामार्फत आदिवासी विकास विभागास सादर करावे.

## परिशिष्ट- इ

### सन २०१९-२० चा जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम तयार करण्याचे वेळापत्रक

| अ.क्र. | कार्यवाही पूर्ण करावयाचा दिनांक | कार्यवाहीचा टप्पा पूर्ण करणे |
|---|---|---|
| १ | दि.१५/११/२०१८ | अंमलबजावणी अधिकारी यांचेकडून जिल्हा आदिवासी उपयोजना नियोजन समिती/ जिल्हा नियोजन समितीकडे प्रस्ताव पाठविणे व त्यांची MP-SIMS मध्ये नोंदणी करणे. |
| २ | दि.२०/११/२०१८ | प्राप्त झालेल्या प्रस्तावांचे / योजनांचे एकत्रिकरण करुन जिल्हा आदिवासी वार्षिक योजनेचे प्रारुप तयार करणे. |
| ३ | दि.३०/११/२०१८ | जिल्हा आदिवासी उपयोजना नियोजन समिती/जिल्हा नियोजन समित्यांनी आदिवासी उपयोजनेच्या प्रारुपास मान्यता देणे व राज्यस्तरीय बैठकीत प्रारुप आराखडा ठेवण्यासाठी शिफारस करणे. |
| ४ | दि.०२/१२/२०१८ | जिल्हाधिकारी कार्यालयाने आदिवासी विकास विभागाकडे जिल्हा योजनांचा प्रारुप आराखडा पाठविणे. |
| ५ | दि.०२/१२/२०१८ ते दि.१५/१२/२०१८ | मा.मंत्री (आदिवासी) यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय बैठकीत जिल्हा नियोजन समितीच्या प्रतिनिधींबरोबर जिल्हानिहाय चर्चा करुन जिल्हा वार्षिक योजनेस अंतिम स्वरुप देणे. |

<u>विवरणपत्र – १</u>

**प्रारुप वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम सन २०१९-२० च्या प्रस्तावित नियतव्ययाचा गोषवारा.**

**जिल्हा :-** **(रुपये लाखात)**

| अ.क्र. | क्षेत्र/उपक्षेत्र | अंमलबजावणी अधिकारी | सन २०१७-१८ | | सन २०१८-१९ | | सन २०१९-२० | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | मंजूर नियतव्यय | प्रत्यक्ष खर्च | मंजूर नियतव्यय | अपेक्षित खर्च | अंमलबजावणी अधिकाऱ्यांनी प्रस्तावित केलेला नियतव्यय | कमाल आर्थिक मर्यादेनुसार प्रस्तावित केलेला नियतव्यय | त्यापैकी भांडवली खर्च |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | पीक संवर्धन | | | | | | | | |
| २ | फलोत्पादन | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | |
| **एकूण** | | | | | | | | | |

**<u>टिप</u> :-** १) वरील स्तंभ २ मध्ये **परिशिष्ट "ड"** मध्ये दर्शविलेल्या गाभा क्षेत्र व बिगर गाभा क्षेत्रातील उपक्षेत्रे घ्यावीत.

२) सन २०१८-१९ चा मंजूर नियतव्यय आदिवासी विकास विभागाने काढलेल्या जिल्हा वार्षिक घटक कार्यक्रम / वित्त विभागाचे प्रकाशन **"परिशिष्ठ ग "** पुस्तकात दर्शविल्याप्रमाणे असावा.

३) स्तंभ ९ ची एकूण बेरीज परिशिष्ट-ब मध्ये जिल्ह्यास दिलेल्या निश्चित कमाल नियतव्यय मर्यादेत असावी.

## विवरणपत्र-२

**प्रारुप वार्षिक आदिवासी उपयोजना सन २०१९-२० च्या विकास क्षेत्रामधील योजना/ प्रकल्प यासाठी प्रस्तावित नियतव्यय आणि भौतिक उद्दिष्टे**

| अ.क्र. | विकासक्षेत्र/ उपक्षेत्र/ योजनेचे/ प्रकल्पाचे नांव | प्रशासकीय विभाग व अंमलबजावणी अधिकारी | सन २०१८-१९ | | सन २०१९-२० | | | भौतिक उद्दिष्टे/साध्य | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | मंजूर नियतव्यय | अपेक्षित खर्च | अंमलबजावणी अधिकाऱ्यांनी प्रस्तावित केलेला नियतव्यय | कमाल आर्थिक मर्यादे- नुसार प्रस्तावित केलेला नियतव्यय | त्यापैकी भांडवली खर्च | बाब | परिमाण | २०१८-१९ | | २०१९-२० |
| | | | | | | | | | | उद्दिष्टे | साध्य | प्रस्तावित उद्दिष्टे |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |
| | | | | | | | | | | | | |
| **एकूण** | | | | | | | | | | | | |

**<u>टिप</u> :-** १) स्तंभ ४ ची एकूण २०१८-१९ च्या आदिवासी विकास विभागाने काढलेल्या पुस्तिकेत दर्शविल्याप्रमाणे नियतव्ययाची आकडेवारी असावी.

२) स्तंभ ७ ची एकूण जिल्ह्याला दिलेल्या सिलिंग इतकी असावी.

## विवरणपत्र-३

## जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारित येणाऱ्या बाह्य सहाय्यित प्रकल्पांसाठी लागणारा नियतव्यय

(रुपये लाखात)

| अ.क्र. | बाह्य सहाय्यित प्रकल्पाचे नांव | प्रकल्पाची मुदत | प्रकल्पाची एकूण अंदाजित किंमत (अलीकडील सुधारित) | एकूण मंजूर विदेशी अर्थसहाय्य | २०१७-१८ पर्यंत झालेला एकूण खर्च | २०१८-१९ मध्ये अपेक्षित खर्च | प्रकल्पाची उर्वरित अंदाजित किंमत (४-६+७) | सन २०१९-२० साठी प्रस्तावित नियतव्यय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | | | | | | | | |

## विवरणपत्र-४

### जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारित येणाऱ्या केंद्र शासन पुरस्कृत योजनांसाठी लागणारा नियतव्यय

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | योजनेचे नांव व केंद्र व राज्य यांच्यामध्ये खर्चाच्या हिश्श्याचे प्रमाण | सन २०१७-१८ मध्ये झालेला खर्च | | | सन २०१८-१९ मधील मंजूर नियतव्यय | | | सन २०१९-२० साठी प्रस्तावित नियतव्यय | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| | | | | | | | | | | |
| | एकूण | | | | | | | | | |

**टिप :-** १) स्तंभ २ मध्ये जिल्हा योजनेतील सर्व उपक्षेत्रातील योजना घ्याव्यात.

२) राज्य हिस्सा म्हणजे जिल्ह्याच्या योजनेतील २०१८-१९ बाबत मंजूर नियतव्यय व २०१९-२० साठी प्रस्तावित नियतव्यय दर्शवावा.

३) केंद्र हिस्सा नियतव्यय योजनेच्या खर्चाच्या प्रमाणानुसार दर्शवावा. सन २०१७-१८ केंद्र हिश्श्याचा प्रत्यक्ष खर्च दर्शवावा.

## विवरणपत्र-५

### विदर्भ, मराठवाडा व कोकण या विभागांच्या जलद विकासासाठी कालबध्द कार्यक्रमांसाठी प्रस्तावित केलेला नियतव्यय

(रुपये लाखात)

| अ.क्र. | कार्यक्रमाचे नांव | २०१७-१८ | | २०१८-१९ | | २०१९-२० |
|---|---|---|---|---|---|---|
| | | नियतव्यय | खर्च | नियतव्यय | खर्च | प्रस्तावित नियतव्यय |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |